3

२०१४०८१९११२५३९४८२३

**सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठानाला सहायक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
शुध्दीपत्रक : टिडीपी २०१२/१/प्रक्र.५९/पर्यटन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांकः ९ मार्च, २०१२

**वाचाः- १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य,क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक डिटीटी १०८२/ ५८८८/सीआर ५३८/पर्यटन,दि.२८/१/१९८५.**

**शासन निर्णय :** सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, **जिल्हा वर्धा यांना देखभालीसाठी व विकाससाठी रुपये १५०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) सन २०११-१२ या वर्षासाठी सहाय्यक अनुदान अदा करण्यासाठी शासन या शासन निर्णयाव्दारे मंजुरी देत आहे.**

२. सदरची रक्कम सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठानास अदा करण्यासाठी श्री. आ.बा.डमाळे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्रीमती. स्वाती म्हसे, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखधिकारी, मुंबई येथून सचिव, सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, जिल्हा वर्धा (The Secretary, Sewagram, Ashram Pratishthan, District Wardha) या नावाने धनादेश काढून संबंधिताना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. या सहाय्यक अनुदानावरील खर्च मागणी क्र.झेडडी-४,लेखाशिर्ष३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१ पर्यटन केंद्रे,०१ -पर्यटन केंद्रे (योजनेतर) (०१)(०४) थंड हवेचे ठिकाण असलेले चिखलदरा नगरपालिकेला सहाय्यक अनुदान (३४५२ १८६ ९) ३१, सहाय्यक अनुदाने, योजनेतर या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा, व तो सन २०११-१२ वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दिनांक १५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत तसेच वित्त विभाग अनोपचारिक संदर्भ क्रमांक ५० दिनांक २१/०२/२०१२ अन्वये सहमतीने व सल्लाने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(आ.बा.डमाळे)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)मुंबई

महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)नागपूर

महालेखाकार, (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई

व्यवस्थाकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

सचिव, सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, जिल्हा वर्धा

वित्त विभाग (व्यय १४) मंत्रालय,मुंबई

नियोजन विभाग (१४४४) मंत्रालय, मुंबई

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागा(अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय,मुंबई

निवड नस्ती.